# चांभाराची भेट



एक  चीनी लोककथा

फार फार वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. चीन देशात एका दूरवरच्या खेड्यामधे एक चांभार राहत असे. तो खेड्यातल्या लोकांसाठी चपला, बूट किंवा पायात घालायच्या वहाणा बनवण्यामधे पटाईत होता. त्याला पैसे कमी मिळत असत, पण  काम त्याच्या आवडीचं असल्यामुळे, तो खूप मेहनत घेऊन, मन लावून आणि सुबकतेने  ते काम करत असे.

एक दिवस त्याला वेगळ्याच प्रकारचा एक चामड्याचा तुकडा मिळाला. “वा, किती छान” त्याने विचार केला, आणि स्वत:शीच म्हणाला, “असं चामडं क्वचितच मिळतं. शिकारी वापरतात तसले उंच बूट मी यापासून बनवीन."





त्याला जेव्हाजेव्हा मोकळा वेळ मिळे, तेव्हातेव्हा तो त्या बुटांवर मेहनत घ्यायला लागला. कधीकधी तो त्या कामात इतका गुंगून जाई, की त्याला दिवस रात्रीचंही भान नसे. शेवटी ते बूट एकदाचे पूर्ण झाले. मग त्या चांभाराने त्यांना पॉलिश केलं आणि ते चमकवले. आता त्याने ते बूट आपल्या घराच्या पुढल्या भागात असलेल्या दुकानात एका खणामधे ठेवून दिले. त्यावेळेस बाहेर तारे चमकत होते आणि चंद्राचं चांदणं पडलं होतं. रात्रीच्या वेळेस कुठेतरी घुबड घुत्कारत होतं पण चांभाराला या कशाकशाची जाणीवच नव्हती. एक तर तो खूप थकला होता. त्याच बरोबर त्याला काम पूर्ण झाल्याचा आनंदही झाला होता. त्याने बूट खणामधे ठेवले, अंथरुणावर आडवा झाला आणि तत्क्षणीच त्याला गाढ झोप लागली.

असं म्हणून चांभार कामाला लागला. त्याच्या डोक्यात ते बूट कसे असतील, कसे दिसतील हे पक्कं बसलं होतं. त्याने काय केलं, नमुना म्हणून पहिल्यांदा तरटाच्या कापडावर बूट बेतून घेतला. त्या कापडाला आपल्याला हवा तसा आकार दिला. आणि त्याचे तुकडे कापून घेतले. मग ते तुकडे चामड्यावर ठेवले, आणि त्याबरहुकूम ते चामडं त्याने छानपैकी कापून काढलं. आणि मग ते तुकडे शिवून जोडले. बूट तर तयार झाले. आता ते बूट त्याला सजवायचे होते. त्याने आपलं सगळं कौशल्य पणाला लावून काम सुरु केलं.



दिवस उजाडला, तशी नेहमी प्रमाणे चांभाराची बायको उठली आणि न्याहारीच्या तयारीला लागली. तिला माहीत होतं की आपला नवरा खूप उशीरापर्यंत काम करत होता. त्याला जाग येऊ नये म्हणून ती हलकेच घरात वावरत होती. तेवढ्यात तिची नजर खणातल्या बुटांवर गेली. ते दिसायला भक्कम आणि खूप छान होते. त्यांची कारागिरी एवढी उत्तम होती की कुठेही खोड काढायला जागा नव्हती. डोळ्यांना सुखावणारे होते ते. “किती सुंदर आणि किती वेगळेच आहेत हे बूट” ती स्वत:शीच म्हणाली. तिच्या चेहेऱ्यावर हास्य उमटले.





लवकरच चांभाराला जाग आली. दोघंही त्या सुंदर बुटांच्या जोडीकडे कौतुकाने पाहत होते. दिवसभरामधे माणसं येत, त्या बुटांच्या जोडीकडे नवलाईने पाहत. बघताबघता त्या अद्भुत दिसणाऱ्या बुटांची बातमी गावात पसरली. आणि जसाजसा दिवस वर जात चालला तसतसे अधिकाधिक लोक बूट बघण्यासाठी येऊ लागले. लोक बघत होते आणि असे विलक्षण शिकारी बूट बनवल्याबद्दल चांभाराची स्तुती करत होते. दिवस मावळला. दुकानातील शेवटचा माणूसही गेला. दुकानात आता ती दोघंच होती. चांभाराच्या बायकोने एक बूट हातात घेतला व म्हणाली, “मला काय वाटतंय माहीतेय का? मला वाटतं हे बूट आपल्याला अश्या तश्या ऐऱ्यागैऱ्या कोणालाही विकता येणार नाहीत.”

तिचे डोळे चमकत होते. नवऱ्याकडे बघून ती म्हणाली “तुम्ही हे बूट राजाला नजराणा म्हणून दिले पाहिजेत.” तिच्या आवाजात ठामपणा होता. चांभाराने आपल्या बायकोकडे आश्चर्यचकित होऊन बघितलं. मग बुटांकडे बघितलं. खरोखरच किती सुंदर आणि वेगळेच



आहेत हे बूट. बांधणीही सुबक आहे. आणि त्याला मनापासून पटलं की मीच बनवले म्हणून नाही, हे बूट खरंच इतके चांगले झाले आहेत की ते राजासाठीच योग्य वाटताहेत. “ठीक आहे” तो म्हणाला. “असंच करतो, मी हे बूट राजाकडेच घेऊन जातो."



दुसऱ्या दिवशी चांभार लवकरच उठला. न्याहारी केली. तोपर्यन्त त्याच्या बायकोने ते बूट काळजीपूर्वक एका सुंदरशा रेशमी कापडात गुंडाळून ठेवले. तिने तांदुळाच्या भाकऱ्याही खायला म्हणून  त्याच्या बरोबर बांधून दिल्या. सगळी तयारी झाली. चांभाराने आपल्या बायकोचा निरोप घेतला आणि त्याने बांधलेले ते छानसे बूट खांद्यावर टाकून राजाकडे जायला निघाला.





राजधानीचे शहर लांब होते. चालायला काही तास लागणार होते. तो चालत असलेल्या रस्त्याच्या बाजूने उंच भिंत होती. काही हल्लेखोर जमातींच्या आणि डाकूंच्या आक्रमणापासून गावाला वाचवण्याकरता म्हणून दूरवर, गावापर्यंत ही भिंत पसरलेली होती.





चांभार शहराच्या वेशीपाशी आला. वेशीच्या दारावर पहारेकरी होता. त्याने चांभाराला येताना पाहिले. सावध होऊन त्याने आपला भाला आडवा घातला. “थांब” पहारेकरी दरडावून म्हणाला,

“कशासाठी आला आहेस? काय हवंय तुला?” त्याने कठोरपणे विचारले. “काय कारणाने आला आहेस ते सांग. त्या शिवाय मी तुला शहरात सोडू शकत नाही." चांभाराने पहारेकऱ्याकडे पाहिले आणि म्हणाला, “मी राजासाठी नजराणा घेऊन आलो आहे”.

पहारेकऱ्याने चांभाराच्या खांद्यावरची झोळी बघितली आणि तो जरा मोकळं बोलू लागला. मग खालच्या आवाजात म्हणाला, “कोणीही राजासाठी नजराणा आणला तर राजा त्याला परतभेट म्हणून काहीतरी देतोच. तू जर का तुला मिळणाऱ्या भेटीमधून तिसरा हिस्सा मला दिलास तर मी तुला शहरात सोडतो." चांभार गोंधळला. त्याला हे काही बरोबर वाटत नव्हते. पण तरीही क्षणभर थांबून त्याने पहारेकऱ्याच्या म्हणण्याला मान्यता दिली. पहारेकऱ्याने आता त्याला आत जाऊ दिले.





आता चांभार शहरातील रस्त्यावरून चालत राजवाडयाकडे निघाला. राजवाडयाच्या प्रवेशद्वारापाशी त्याला दुसऱ्या दरवानाने अडवले. “थांब” दरवान बोलला. “कशासाठी आला आहेस? काय हवंय तुला?” परत तेच प्रश्न. “मला राजाला भेटायचं आहे. मी राजासाठी नजराणा घेऊन आलो आहे.” चांभार म्हणाला. ते ऐकून खालच्या आवाजात तो दरवान म्हणाला, “कोणीही इथे आला तर राजा त्याला परतभेट म्हणून काहीतरी देतोच. तू जर का तुला मिळणाऱ्या भेटीमधून तिसरा हिस्सा मला दिलास तर मी तुला महालाच्या दारापाशी सोडतो.

“अरेच्चा." चांभार मनाशीच म्हणाला, “इथे तर सारे ठगच दिसतायत! मला तर फक्त हे बूटच राजाला द्यायचे आहेत.” मग तो पहारेकऱ्याला म्हणाला, “ठीक आहे, राजा जे काही मला देईल त्यातला तिसरा हिस्सा मी तुला देईन.” पहारेकरी बाजूला झाला, आणि त्याने त्या चांभाराला पुढे जाऊ दिले. चांभार त्या प्रासादाच्या प्रांगणातून पुढे निघाला. दरबारात शिरण्याआधी दुहेरी दरवाजा होता. तिथेही दारावर एक दरवान पहाऱ्याला होता. आता हा तिसरा दरवान पुढे झाला.





“थांब, कशासाठी आला आहेस? काय काम आहे, ते सांगितल्या शिवाय मी तुला राजाच्या दालनात सोडू शकत नाही” त्याला अडवत दरवान दरडावून बोलला. “मी राजासाठी नजराणा घेऊन आलो आहे” त्या चांभाराने शांतपणे आणि ठामपणे संगितले. “अस्सं.” दरवानाने त्याच्या झोळीकडे बघितले, मग अगदी खालच्या आवाजात कुजबुजला, “असा प्रत्येक जण ह्या दरवाज्यातून राजाला भेटायला जाऊ शकत नाही, पण तू जर का राजा तुला जे देईल त्यातला तिसरा हिस्सा मला देण्याचे " कबूल केलेस तर मी तुला आनंदाने ह्या दरवाज्यातून आत जाऊ देईन.” ह्या वेळेस अजिबात का कू न करता चांभाराने म्हटले, “कबूल. राजा जे देईल त्यातला तिसरा हिस्सा मी तुला देतो.” असं म्हणताक्षणीच दरवानाने तो दरवाजा उघडला.






चांभाराने एक दीर्घ श्वास घेतला. थोडी मान झुकवून उंबरठा ओलांडला आणि राजाच्या दालनात प्रवेश केला. दालन प्रशस्त होतं आणि दालनाच्या टोकाला एका उंच अशा मंचावर राजा त्याच्या सिंहासनावर बसला होता. त्याच्या दोन्ही बाजूंना मागे सेवक चवऱ्या ढाळत होते. मागचे दोन्ही दरवाजे बंद झाले, चांभाराने राजाकडे पाहिलं. राजाने हाताने खूण करून त्याला जवळ बोलावलं. चांभार चालत त्या मंचाच्या पायरीपाशी आला. त्याने आपल्या खांद्यावरची झोळी काढली आणि रेशमाच्या कापडात गुंडाळलेले ते बूट खाली ठेवले. तो गुडघ्यांवर बसला आणि त्याने तीन वेळा मान लववून राजाला मुजरा केला.



"कोण आहेस तू?" राजाने विचारले. "कशासाठी इथे आला आहेस?" "मी एका खेडेगावातला चांभार आहे". चांभार उत्तरला. अजूनही तो मान झुकवून आणि हात दुमडूनच बोलत होता. "काही दिवसांपूर्वी मला एक उत्तम चामड्याचा तुकडा मिळाला होता. त्या चामड्यापासून मी ह्या शिकारी बुटांची जोडी बनवली. माझ्या गावातले सगळेजण हे बूट बघायला आवर्जून येऊन गेले. त्या सर्व जणांनी बुटांची तारीफ केली. ती सर्व माणसं गेल्यावर माझी बायको म्हणाली, की हे बूट इतके चांगले झाले आहेत की ते फक्त राजांनाच वापरण्यायोग्य आहेत. आम्हांला दोघांना ही गोष्ट इतकी मनापासून पटली की मी हे बूट तुम्हांला देण्यासाठी आणले आहेत.



राजा पुढे वाकून उत्सुकतेनं पहात होता. चांभाराने कापडात गुंडाळलेले शिकारी बूट काढले व राजाला दाखवले. ते खरोखरच खूप छान होते. राजा उठला व मंचावरून खाली उतरला. त्याने बूट उचलले आणि बुटांवरून हात फिरवला. "वा वा!" तो म्हणाला. "ही बुटांची जोडी खरोखरच विलक्षण हस्तकौशल्याचा अजोड नमुना आहे. त्यातली तुझी कारागिरी उत्कृष्ट दर्जाची आहे. तुझ्या कुशल हातांमधलं कसब खरोखरच तारीफ करण्यासारखंच आहे."मग राजा आपल्या सिंहासनावरून उतरुन सरळ खालच्या पायऱ्यावर बसला, आणि बूट घालून बघू लागला. ते खूप मोठे नव्हते आणि लहानही नव्हते. खरं तर, ते राजासाठी एकदम योग्य मापाचे होते. राजा उभा राहिला, आणि मंचावर परत आला. त्याने आपला पायघोळ अंगरखा थोडा वर केला आणि





पायातील बुटांकडे पाहिले. "मी हे शिकारी बूट आनंदाने स्वीकारतो." तो हसून म्हणाला. "शाही प्रथेप्रमाणे मला तुला कौतुकाची भेट देण्यात आनंदच होईल." तुझ्या मनात जी काही इच्छा असेल ती मला सांग, शक्य असेल तर मी ती अवश्य पूर्ण करीन. चांभार विचारपूर्वक म्हणाला, "राजेसाहेब! मी तुमच्याकडून भेट मिळेल या अपेक्षेने आलोच नाही. बूट तुम्हाला आवडले हेच माझं बक्षीस आहे. परंतु, शाही प्रथा असल्याने आणि तुम्हाला काही द्यायचेच असेल तर एक विनंती आहे. हे प्रभो, तुमच्या एखाद्या बलवान रक्षकाकरवी मला एका लांब, भक्कम लाकडी काठीने नव्व्याण्णव फटके द्या.



राजा आश्चर्यचकित झाला. त्याने चांभाराकडे निरखून पाहिले. "काय?" त्याने आश्चर्याने विचारले. "तुझी अशी इच्छा आहे की माझ्या सर्वात बलवान रक्षकाने तुला लांब लाकडी काठीने नव्व्याण्णव फटके द्यावे? असा आदेश मी काढावा?नक्कीच तू यापेक्षा काहीतरी चांगले मागू शकतोस!" "नाही!" चांभार मनापासून म्हणाला. "माझी विनंती आहे की आपण माझी ही इच्छा पूर्ण करावी." "हे खरोखर विलक्षण आहे." राजा स्वतःशी म्हणाला. त्याने तिरक्या नजरेने चांभाराकडे पाहिले. "पण जेव्हा एखादा माणूस इतक्या ठामपणे बोलत असेल तर त्यावर विश्वास का ठेवू नये? का मी त्याची विनंती अमान्य करु?"

असा विचार करून राजा आपल्या मुख्य सचिवांकडे वळला. "मी या चांभाराला लांब, भक्कम लाकडी काठीने नव्व्याण्णव फटके देण्याची आज्ञा देतो." तो म्हणाला. “हे फटके आपल्याकडील सर्वात बलवान रक्षकाने द्यावेत.” मग राजा पुढे म्हणाला, "पण त्या रक्षकास सावधगिरी बाळगायला सांगा की तो जास्त जोरात मारणार नाही, जेणेकरून त्याला दुखापत होईल." "जास्त काळजी घेऊ नका!" चांभार मोठ्या आवाजात बोलला. अर्धवट हसत हसत तो पुढे म्हणाला, "रक्षकाला शक्य होईल तितके कठोर प्रहार करायला सांगा. फटका जेवढा जोराचा तेवढा जास्त चांगला.“ हे सर्व बोलणे



राजाला गोंधळातच पाडणारे होते. परंतु तरीही त्याने आदेश दिला आणि आपल्या मुख्य सचिवांना तो अंमलात आणायला संगितले. मग मुख्य सचिवांनी चांभाराला राजवाड्यातून बाहेर नेले. शहराच्या बाहेर ज्या ठिकाणी फटक्यांची शिक्षा दिली जाते तिथे ते सर्व जायला निघाले.





राजाच्या दालनाच्या बाहेर पडताना तिथला तिसरा दरवान अजूनही कामावर होता. चांभाराने त्याच्या शेजारुन जाताजाता हलक्या आवाजात त्याला आपल्या मागोमाग येण्यास संगितले. “मी राजाने दिलेल्या भेटीतला तुझा तिसरा हिस्सा तुला देववतो. ” तो म्हणाला. दरवानाने दरवाज्यावर आपल्या जागी दुसऱ्याला उभे केले आणि तो सचिव व चांभार यांच्या मागे चालायला लागला. राजवाडयाच्या प्रवेशद्वारापाशी दुसरा दरवानही दक्ष उभा होता. त्यालाही त्याच्या शेजारुन जाताजाता हलक्या आवाजात आपल्या मागोमाग येण्यास सांगितले. म्हणाला, "तुला राजाने दिलेल्या भेटीतला तुझा तिसरा हिस्सा देववतो." या दरवानाने देखील दरवाज्यावर आपल्या बदली दुसऱ्याला उभे केले आणि तो तिसऱ्या दरवानाच्या मागे चालायला लागला.



आता ते सगळे शहराच्या वेशीपाशी आले. तिथे पहिला पहारेकरी सावधान स्थितीत सरळ नजर रोखून ताठ मानेने उभा होता. चांभार समोरुनच त्याच्यापर्यंत पोचला आणि कुजबुजला, “माझ्या मागे ये. तुला मी राजाने दिलेल्या भेटीतला तुझा तिसरा हिस्सा देववतो.” पहारेकऱ्याचा जोडीदार इशारा केल्यावर तात्काळ त्याच्या जागेवर आला आणि पहिला पहारेकरी दुसऱ्या दरवानामागे इतर सर्वांबरोबर चालायला लागला.



ती सगळी मंडळी आता थोड्या अंतरावर एक चौथरा होता तेथे आली. चौथऱ्याच्या बाजूला दोन हट्टेकट्टे जवान रक्षक उभे होते. एकाच्या हातात एक लांब रुंद मजबूत काठी होती. तेथे पोचल्यावर मुख्य सचिवांनी राजाचा आदेश सांगितला. त्याचे पालन होते आहे हे बघणं त्यांचं कर्तव्य होतं. त्यांना स्वत:ला उत्सुकता होती, की काय कारणांनी चांभाराने अशा प्रकारची नव्व्याण्णव फटके देववण्याची इच्छा व्यक्त केली असेल? राजाचा मुख्य सचिव आता बोलण्यासाठी उभा राहिला. त्याने चांभाराकडे पाहिले. तो काही बोलणार त्याआधीच चांभार बोलता झाला. “आता मी सांगतो काय गोष्ट आहे, ती ऐका. आज मी शहरात आलो ते राजाला नजराणा द्यायचा होता म्हणून. राजाला भेटण्यासाठी आधी मला आता हे जे तिघे जण आहेत त्यांच्या पहाऱ्यातून जावे लागले. प्रत्येकाने मला एका अटीवरच पुढे जाऊ दिले. ती अट म्हणजे मी नजराणा दिल्यावर शाही प्रथा म्हणून राजा जी काही परतभेट देईल त्यातला तिसरा हिस्सा मी त्या प्रत्येकाला द्यायला हवा. मी त्या तिघांना कबूल केलं की मी तुम्हाला तिसरा हिस्सा देईन. राजाने मला





लांब लाकडी काठीने नव्व्याण्णव फटके लगावण्याची ‘भेट’ दिली. आता मी त्या तिघांना कबूल केल्याप्रमाणे आपण राजाचा आदेश पाळावा.“ "आणि ह्या रक्षकाने हातातल्या काठीने ह्या प्रत्येकाला नव्व्याण्णवातला तिसरा भाग, म्हणजे तेहतीस फटके द्यावे."

“ओहोहो. म्हणजे असं आहे तर.” राजाचा मुख्य सचिव स्वत:शीच बोलला. आता तो पुढे झाला, आणि त्या तिघांकडे वळून खणखणीत आवाजात म्हणाला,



““महाराजांच्या आदेशानुसार मी असा हुकूम देतो की तुम्ही तिघांनी प्रत्येकी तेहतीस फटके खाल्ले पाहिजेत. आणि या हुकूमाचे पालन हे आत्ताच होईल." मग त्याने हातात काठी घेऊन असलेल्या रक्षकास सांगितले, "राजाचा हुकूम असाही आहे की फटके मारताना जपून मारु नकोस. उलट जेवढे जोरात बसतील तेवढे चांगले."







हळू हळू आता तिथे लोक गोळा होऊ लागले होते.

ज्या रक्षकाच्या हातात काठी होती तो बाह्या सरसावून तयार झाला. दुसऱ्या रक्षकाने शहराच्या वेशीवर काम करणाऱ्या पहारेकऱ्यास चौथऱ्यावर ओणवा होण्यास सांगितले. पहिल्या रक्षकाने पहारेकऱ्याच्या पाठीवर तेहतीस फटके मारले. ते मारुन झाल्यावर राजवाड्याच्या बाहेर काम करत असलेल्या पहारेकऱ्याला पुढे येण्यास सांगितले. तो ही चौथऱ्यावर ओणवा राहिला आणि त्यानेही तेहतीस फटके खाल्ले. शेवटी राजाच्या दालनाबाहेर कामावर असलेला दरवान चौथऱ्यावर ओणवा राहिला आणि त्यानेही त्याच्या वाटणीचे तेहतीस फटके खाल्ले.

ज्या वेळेस ही राजाच्या हुकुमाची तालीम होत होती तेव्हा लोकही गोळा होत होते. बातमी पसरत गेली आणि सारी अंमलबजावणी पूर्ण झाली तोपर्यंत लोकांना चांभार, त्याने बनवलेले उत्कृष्ट शिकारी बूट आणि तीन लाचखोर पहारेकरी यांची माहिती झाली. खूप लोक गोळा झाले. हुकुमाची अंमलबजावणी पूर्ण झाली. लोकांनी घोषणा द्यायला सुरवात केली आणि त्यांनी चांभाराच्या नावाचा जयजयकार केला. त्याला दीर्घ आयुष्य चिंतिले. चांभाराला ज्यांनी फसवले, लुबाडण्याचा प्रयत्न केला, त्यांना राजाकडून योग्य ती शिक्षा करवली म्हणून लोकांनी चांभाराचं कौतुक केलं.





राजा अजून आपल्या दालनातच होता. त्याच्या कानांपर्यन्त लोकांचा आरडाओरडा पोचला. "कसले आवाज आहेत? वेशीपाशी आरडाओरडा कोण करत आहेत?" राजा राजवाड्याबाहेर आला आणि भिंतीवर चढून तो टेहळणी बुरुजावर गेला. त्याने खाली असणारा जमाव पाहिला आणि एका टोकाला आपल्या मुख्य सचिवाला चांभाराशी हसून बोलताना पाहिले. राजाने मुख्य सचिवाला निरोप पाठवला.



मुख्य सचिव घाईघाईने टेहळणी बुरुजावर राजापाशी आला. त्याने राजाला तीन पहारेकरी, त्यांनी चांभाराला कसं फसवायचा प्रयत्न केला, ह्या बद्दल सर्व सांगितले. ते ऐकून राजा चमकला आणि मग हसू लागला. “आश्चर्य नाही त्याने ही अशी इच्छा प्रकट केली ते.” तो म्हणाला. “आणि त्याला फटकेसुद्धा खूप जोराचे पाहिजे होते ते.” राजाने चांभाराला आपल्या समोर हजर करण्याची आज्ञा केली. त्याप्रमाणे चांभार टेहळणी बुरुजावर आला. राजाने त्याला शाबासकी दिली “तू योग्य तेच केलेस” राजा म्हणाला.



चांभाराने राजाकडे हसून पाहिले. हात दुमडून घेतले आणि त्रिवार वाकून राजाला दंडवत घातला. आणि तो राजाला पाठ न दाखवता, नजर खाली ठेवत एक एक पाय मागे टाकत बाहेर पडला. बाहेर पडताना नजर खाली असल्यामुळे त्याला शेवटचं दृश्य काय बरं दिसलं असेल! तीच सुंदर शिकारी बुटांची जोडी, जी त्याने स्वत:च्या हाताने बनवून राजासाठी आणली होती. राजा अजून तेच बूट घालून बसला होता.

तो आपल्या खेडेगावातल्या घरी आला. त्या रात्री तो खरंच सुखावला होता. आपल्या अंथरुणावर पडल्या पडल्या त्याला शांत आणि गाढ झोप लागली.

**समाप्त**